सन २०१८-१९ मध्ये "फलोत्पादन पीक संरक्षण योजना" राज्यात राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र.फपीसं-२०१८/प्र.क्र.१८६/९-अे**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक- ०६ ऑगस्ट, २०१८

**संदर्भ:-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.

२. कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९ एप्रिल २०१८

**प्रस्तावना :-**

फळपिके, भाजीपाला, फुलपिके, मसाला पिके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकांवरील सर्व किड/रोग नियंत्रणासाठी औषधांचे वाटप/फवारणीसाठी राज्यात फलोत्पादन पिक संरक्षण योजना राबविण्यात येते. फलोत्पादन पिक संरक्षण योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरीता, रु. १०० लाख तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. अर्थसंकल्पीत तरतूदीमधून ७०% निधी वितरीत करण्याच्या सूचना वित्त विभागाने संदर्भाधीन दि.०२ एप्रिल २०१८ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. त्यानुसार सन २०१८-१९ मध्ये सदर योजना राज्यात राबविण्यास रू.१०० लाखाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता व रुपये ७०लाख (रुपये सत्तर लाख फक्त) इतकी रक्कम आयुक्त कृषि यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१८-१९ मध्ये "फलोत्पादन पीक संरक्षण योजना" राज्यात राबविण्यास रु.१०० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून, सदर योजना राबविण्यासाठी रुपये ७० लाख (रुपये सत्तर लाख फक्त) रक्कम आयुक्त कृषि यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

२. **आंहरण व संवितरण अधिकारी:-** सदर योजनेसाठी संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी, हे आंहरण व संवितरण अधिकारी राहतील.

३. **सनियंत्रण आढावा:-** संचालक (फलोत्पादन) कृषि आयुक्तालय, पुणे यांना संनियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित विभागीय कृषि सहसंचालक, या योजनेचा आढावा घेऊन योजनेच्या पुर्ततेचा अहवाल संचालक (फलोत्पादन) यांना सादर करतील. या योजनेंतर्गत लाभ

घेणाऱ्या लाभार्थ्यांची यादी तपशीलासह कृषि विभागाच्या अधिकृत संकेत स्थळावर प्रदर्शित करण्यात येईल.

४. या योजनेसाठी होणारा खर्च रु.७० लाख (रु.सत्तर लाख फक्त ) सन २०१८-१९ या वर्षाकरीता मंजूर व अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीनुसार खालील लेखाशिर्षातून भागाविण्यात यावा.

**" मागणीक्र.डी -३,**
**२४०१- पीक संवर्धन,**
**११९ बागायती व भाजीपाला पिके**
**(०१) (२०) - पीक संरक्षण योजना**
**(२४०१ ३२१५)**
**३३-अर्थसहाय्य**

५. **<u>योजनेची उद्दीष्टये:-</u>** फळपीके, भाजीपाला, फुलपीके, मसाला पीके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकांवरील सर्व कीड/रोग नियंत्रणासाठी औषधाचे वाटप/फवारणी कार्यक्रम यासाठी ५० टक्के अनुदान उपलब्ध करून देण्यात येईल. सदर योजनांतर्गत संत्रा पिकावरील काळी/पांढरी माशी (कोळशी), फायटोप्थोरा रोग, आंब्यावरील तुडतुडे व भुरी रोग, चिकुवरील बी पोखरणारी अळी, नारळावरील ईरिओफाईड माईट्स सुपारीवरील कोळेरोग, काजूवरील टी-मॉस्कुटो, केळीवरील करपा, बटाट्यावरील करपा रोग, मिरचीवरील चुरडामुरडा, कांदा पिकावरील फुलकिडे व करपा, पानमळयावरील करपा या किड/रोगांच्या नियंत्रणासाठी फवारणीचा कार्यक्रम राबविण्यात येईल. त्याचप्रमाणे उपरोक्त पिकांव्यतिरिक्त इतर फळपीके, भाजीपाला, फुलपीके, मसाला पीके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकांमध्ये अचानक किड रोगाचा प्रादुर्भाव आढळून आल्यास त्यावरही संबंधीत जिल्ह्याला उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या अधिन राहून पिक संरक्षण कार्यक्रम राबविण्यात यावा.

६. **लाभार्थीची निवड:-** सदर योजनेंतर्गत सर्वसाधारण, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती इत्यादी प्रकारचे शेतकरी पात्र राहतील. तथापि, अल्प भूधारक शेतकरी व अनुसूचित जाती/जमातीच्या शेतकऱ्यांना या योजनेचा प्राधान्याने लाभ देण्यात यावा.

७. **लाभार्थ्याची ओळख:-** जैविक/रासायनिक किटकनाशके व बुरशीनाशके या कृषि निविष्ठांचा अनुदानावर पुरवठा करण्याकरिता सदर योजनेंतर्गत लाभार्थी निवडीचे निकष खालीलप्रमाणे आहेत-

७.१ शेतकऱ्यांच्या स्वत:च्या नावे असलेल्या शेतीच्या क्षेत्राचे ७/१२ व ८ अ चे दाखले.

७.२ लाभार्थी अनुसूचित जाती/जमाती या प्रवर्गातील असल्यास त्याबाबत प्राधिकृत अधिकाऱ्यांनी दिलेल्या वैध जात प्रमाणपत्राची प्रत.

७.३ आधार ओळखपत्राची प्रत.

७.४ अर्जदार शेतकऱ्याने त्याचे बँकेचे खाते आधार क्रमांकाशी जोडून घेणे आवश्यक असून त्याकरीता त्याने बँकेला दिलेल्या पत्राची व बँकेकडून मिळालेल्या पोहोच पावतीची प्रत.

**८. किटकनाशके/बुरशीनाशके यांची खरेदी:-** किडरोग नियत्रंणासाठी संचालक (फलोत्पादन) यांनी मंजूर केलेल्या यादीप्रमाणे शेतकऱ्यांनी किटकनाशके/बुरशीनाशके यांची खरेदी करावी. संचालक (फलोत्पादन) यांनी किटकनाशके /बुरशीनाशकांची शिफारस जेनेरिक नावाने करावी. संदर्भांकित शासन निर्णय दि.१९/०४/२०१७ नुसार महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाची कंपनी महाराष्ट्र इन्सेक्टीसाईड लिमिटेड (MIL) यांनी स्वत: उत्पादित केलेल्या रासायनिक व जैविक कीटकनाशके/ बुरशीनाशके यांच्या पुरवठयासंदर्भात डीबीटी धोरण लागू होणार नाही. परंतु, त्यांची उत्पादने अनुपलब्ध असल्यास खाजगी कंपन्यांची रासायनिक व जैविक कीटकनाशके/बुरशीनाशके यांची खरेदी करण्याची मुभा शेतकऱ्यांना राहिल.तथापि याकरिता शेतकऱ्यांना डीबीटी द्वारे अनुदान अदा करण्यात यावे.

**९. अनुदानाचे प्रमाण** -सदर योजनेंतर्गत पुरवठा करावयाच्या कीटकनाशकाची उत्पादनावर छापण्यात आलेली कमाल विक्री किंमत व प्रत्यक्ष विक्री किंमत यापैकी जी कमी असेल ती ५० टक्के अनुदानासाठी ग्राहय धरण्यात येईल. खरेदी पावती कृषि विभागाकडे सादर केल्यानंतर ५० टक्के अनुदान शेतकऱ्यांच्या खात्यावर डीबीटी द्वारे जमा करण्यात येईल.

**१०. किटकनाशकाचा दर्जा, गुणवत्ता व तांत्रिक निकष:-**

**१०.१** लाभधारकांना जैविक/रासायनिक किटकनाशके व बुरशीनाशकांची खरेदी अधिकृत विक्रेत्यांकडून करताना विक्रेत्याने देयकावर सदर निविष्ठेचे जेनेरिक/तांत्रिक नाव नमुद करणे बंधनकारक आहे. देयकाची अदायगी करताना संबंधीत याबाबत खात्री करतील. सदर निविष्ठांच्या तांत्रिक नावाची माहिती cibrc.nic.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**१०.२** कृषि निविष्ठांची खरेदी अधिकृत विक्रेत्यांकडून करताना संबंधीत विक्रेत्याने बिलाच्या मागे खाली नमूद केल्याप्रमाणे प्रमाणपत्र द्यावे.

"बिलात नमुद केलेल्या जैविक/रासायनिक किटकनाशकाचे समावेश माझ्या स्वत:च्या विक्री प्रमाणपत्रात आहे."

स्वाक्षरी व शिक्का

**१०.३** कृषि विकास अधिकारी यांनी जिल्हा स्तरावर त्या त्या जिल्हयात पिक रचना व पिक परिस्थितीनुसार वापरण्यात येणाऱ्या किटकनाशकांची यादी कृषि विद्यापीठांचे सल्यानुसार तयार करावी तसेच, सदर यादीमध्ये पुढील बाबी नमुद असतील.

(१) **पिकाचे नाव**
(२) **किड रोगाचे नाव**
(३) **वापरावयाचे किटकनाशके**
(४) **किटकनाशक वापरण्याचे प्रमाण**

उपरोक्त माहितीव्यतिरिक्त आवश्यकतेनुरुप इतर माहिती नमुद करण्यात यावी व सदर यादी सर्व क्षेत्रिय कर्मचाऱ्यांपर्यंत जिल्हा स्तरावरून पुरविण्यात यावी.

**११. थेट लाभ हस्तांतरण पध्दतीने (डीबीटी) लाभार्थ्याच्या बँक खात्यात रोख रक्कमेचे हस्तांतरण:-**

११.१ लाभार्थी ज्या डिलर/विकेत्यांकडून कृषि निविष्ठा घेणार आहे, तो वैध विक्रेता परवानाधारक, दुकाने व आस्थापना अधिनियमाखालील वैध परवानाधारक असावा.

**११.**२ थेट लाभ हस्तांतरण करण्याकरिता, शासनाने विहित केलेल्या गुणवत्ता, दर्जा व तांत्रिक निकषापेक्षा विनिदैशनापेक्षा कमी नसलेल्या गुणवत्तेच्या, दर्जाच्या व तांत्रिक निकषांचा, योजनेंतर्गत मंजूर जैविक/रासायनिक किटकनाशके/बुरशीनाशके उत्पादक कंपनीच्या कोणत्याही अधिकृत विक्रेत्याकडून विकत घेण्याची मुभा लाभधारकास राहिल.

**११.३** लाभार्थी शेतकऱ्यांनी किटकनाशकांची/बुरशीनाशकांची खरेदी अधिकृत विक्रेत्याकडून कॅशलेस पध्दतीने करावी. त्याकरिता त्याने त्याच्या आधार क्रमांकाशी निगडीत स्वत:च्या बँक खात्यामधून विक्रेत्याला देय किंमतीचे प्रदान करावे. म्हणजेच एनईएफटी, आरटीजीएस इत्यादी इलेक्ट्रोनिक फंड ट्रान्सफर किंवा धनाकर्ष (डिमांड ड्राफ्ट), धनादेश (चेक) व्दारे किंमतीचे प्रदान होणे आवश्यक आहे व त्याचा पुरावा अनुदान मागणीचा दावा करताना सादर करणे आवश्यक राहील.

**११.४** लाभार्थी शेतकऱ्यांनी किटकनाशकांची/बुरशीनाशकांची खरेदी केल्यानंतर देयकाची प्रत विक्रेत्याकडून दोन प्रतित घ्यावी. त्यापैकी एका देयकाची स्वयं साक्षांकीत प्रत कृषि विभागाच्या संबंधीत अधिकाऱ्याकडे/कार्यालयाकडे सादर करावी. त्यांची ओळख संगणकावर बायोमॅट्रिक पध्दतीने नोंदविण्यात यावी. वरील ३ मध्ये नमूद केलेल्या पुराव्याव्यतिरिक्त देयकासह अन्य कोणतेही

कागदपत्र सादर करण्याची सूचना लाभधारकास दिली गेली असल्यास त्याची प्रत सादर करणे आवश्यक राहील.

११.५ शासन सूचनेनुसार काही देयकांची संबंधीत विभागाकडून पडताळणी/तपासणी करुन घेण्यात येईल. जेणेकरुन खोटया देयकाच्या आधारे अनुदानाची रक्कम मिळण्यावर नियंत्रण राखणे शक्य होईल.

**११.६** वरीलप्रमाणे कार्यवाही झाल्यावर अनुदानाची संपूर्ण रक्कम लाभार्थ्यांच्या बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरण (डीबीटी) व्दारे १५ दिवसांच्या आत जमा करणे, सेवा हमी कायद्यान्वये बंधनकारक राहील.

**११.७** लाभार्थी स्वत: विक्रेत्याकडून किटकनाशकांची/बुरशीनाशकांची खरेदी करणार असल्याने किटकनाशकाच्या गुणवत्तेसंदर्भात कृषि विभागाची कोणतीही जबाबदारी असणार नाही.

**११.८** किटकनाशकाची खरेदी करणे आर्थिकदृष्टया दुर्बल शेतकऱ्यांना सोईस्कर व्हावे, याकरिता कृषि विकास अधिकारी यांना जिल्हयाच्या पत आराखडयामध्ये योग्य उद्दिष्ट व आर्थिक तरतूदीचा समावेश करावा.

१२. शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीचा विनियोग तत्काळ करण्यात यावा. तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (फलोत्पादन) यांनी शासनास उपयोगीता प्रमाणपत्र वेळोवेळी सादर करावे.

१३. या शासन निर्णयाची अंमलबजावणी काटेकोरपणे होईल याची दक्षता आंहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करतांना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश आणि भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण यांचे पालन होईल या अटीच्या अधीन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

हे आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९ अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ मधील अटींची पुर्तता करण्याच्या अधिन राहून, प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०६१६१३५७०००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant
Chandrakant
Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.08.06 16:16:53 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. अपर मुख्य सचिव, (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२
४. आयुक्त (कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. उपसचिव (फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
७. संचालक(फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
८. सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१०.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
११.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२.सहाय्यक संचालक (लेखा), आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१३.माहिती व जनसंपर्क संचालनालय (प्रसिद्धीसाठी), मंत्रालय, मुंबई-३२.
१४.निवडनस्ती.